आस्थापना:- पोलीस अधीक्षक, चंद्रपूर यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना मुदतवाढ मिळणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक:- टिआरए-०१०४/सीआर-५१/पोल-८.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक:-१६ मार्च, २००४.

वाचा:- १) शासन निर्णय, गृह विभाग क्र. टिआरए -०१०३/सीआर-२५/पोल-८, दिनांक २७.१.२००४

२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६/६१४३/पोल-८/चंद्रपूर/०३, दि. ६ मार्च, २००४.

शासन निर्णय :- पोलीस अधीक्षक, चंद्रपूर यांच्या आस्थापनेवरील ४४ अस्थायी पदांना संदर्भ क्रमांक:१ मध्ये नमूद शासन निर्णयान्वये दि.०१.०१.२००४ पासून दि.२९.२.२००४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. सदर अस्थायी पदांपैकी एकही पद स्थायी करण्यात आलेले नाही. सदर ४४ अस्थायी पदांना दि.०१.०३.२००४ पासून दि.३१.८.२००४ पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देत आहे. ही मुदतवाढ सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त असलेली पदांना लागू होणार नाही.

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.बी-१ "२०५५-पोलीस-१०९-जिल्हा पोलीस-(००) (०१) जिल्हा पोलीस दल" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो सन २००४-२००५ च्या मंजूर अनुदानातून भागवावा.

३. हा निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर-२१८/०४/व्यय-७, दि.१२.१.०४ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( स.ह.भोसले )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
पोलीस अधीक्षक, चंद्रपूर
महालेखापाल-२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर.
वित्त विभाग, व्यय-७, अर्थसंकल्प-१९
निवड नस्ती.(पोल-८)

गृह विभाग/पोल-८

चंद्रपूर जिल्हा पोलीस बल यांचे आस्थापनेवरील विविध अस्थायी पदांना दिनांक १.३.२००४ पासून दिनांक ३१.८.२००४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या पदांचे विवरणपत्र.

| अ.क्र | पोलीस महासंचालक यांचा नस्ती क्रमांक | विषय | प्रस्तावित पदे | | पदे निर्माण केल्याचा शासन निर्णय,गृह विभाग, क्रमांक व दिनांक | मागील वर्षात मुदतवाढ दिलेला शासन निर्णय,गृह विभाग, क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | पदनाम | पदसंख्या | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | क्र.१५-प/८२१४/वा.फो.चंद्रपूर/पोल-८, दि.२७.११.९१ | चंद्रपूर शहरात स्वतंत्र वाहतूक शाखेकरिता निर्माण करण्यात आलेल्या अस्थायी पदांना मुदतवाढ मिळण्याबाबत. | पो.उ.नि.<br>पो.हवा.<br>पो.शि.<br>चा.पो.शि. | ०१<br>१०<br>३१<br>०२<br>४४ | शा.नि.गृवि.क्र.टिआरए १२९१/४/पोल-८, दि.२३.६.१९९२ | टिआरए ०१०१/सीआर २५/ पोल-८, दि.२७.१.२००४ |